मराठी भाषा फौंन्डेशन योजना तसेच स्पर्धा परिक्षा योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध अनुदान वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-अविवि-२०२४/प्र.क्र.८/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०२४

वाचा:- (१) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.मभायो २०१३/प्र.क्र ६७/का-९ दि.२७.४.२०१५.
(२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.मभायो २०१५/प्र.क्र.४१/का-९दि.८.८.२०१६.
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं - २०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.४.२०२३.
(४) शिक्षण संचालक, शिक्षण संचालनालय (योजना), महाराष्ट्र राज्य पुणे यांचे क्र.शिसंयो / मभाफा २०२३-२४/यो-२/१७४४/दि.१८.८.२०२३ व १९४१, दि.८.९.२०२३ चे पत्र.
(५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २०२४/प्र.क्र.८/का-९/दि.१५ जानेवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अमराठी शाळांमध्ये इयत्ता ८वी, ९वी व १०वी इयत्तेत शिकत असलेल्या अल्पसंख्याक लोकसमूहातील विद्यार्थ्यांसाठी राबविण्यात येणाऱ्या मराठी भाषा फाऊंडेशन वर्ग योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षामध्ये नियुक्त करण्यात आलेल्या मानसेवी शिक्षकांचे मानधन अदा करण्याकरीता तसेच स्पर्धा परिक्षा योजनेकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी भाषा फौन्डेशन योजना व स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्राकरीता सन २०२३-२४ वर्षासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग "२२३५ ए २५८" (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु.४.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. अर्थसंकल्पीत निधीपैकी वित्त विभागाने ५०% म्हणजेच रू.२.०० कोटी एवढा निधी वितरणासाठी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे. त्यापैकी संदर्भ क्र.५ दि.१५ जानेवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये रु.८०.०० लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तर रु.१.२० कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

२. उपलब्ध निधीमधुन मराठी भाषा फाउंडेशन योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षामध्ये नियुक्त मानसेवी शिक्षकांचे मानधन अदा करण्याकरीता रु.१,११,३०,१४७/- (अक्षरी रुपये एक कोटी अकरा लक्ष तीस हजार एकशे सतेच्याळीस फक्त) व स्पर्धा परिक्षा योजनेकरीता रु.८,६९,८५३/- (अक्षरी रुपये आठ लक्ष एकोनसत्तर हजार आठशे त्रेपन्न फक्त) असे एकूण **रु.१,२०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी वीस लक्ष फक्त)** "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली निधी मंजूर करुन सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई यांच्याकडे शिक्षण संचालक, शिक्षण संचालनालय (योजना) पुणे यांना तसेच स्पर्धा परिक्षा योजनेकरीता वितरीत करण्याकरीता सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग हे आहरण व संवितरण अधिकारी आणि सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित नमून्यात शासनास सादर करणे आवश्यक राहील. तसेच संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

४. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग (योजनांतर्गत) (२२३५ ए २५८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे."

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१२२७१०४५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.03.26 12:37:12 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागार
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) शिक्षण संचालक, शिक्षण संचालनालय (योजना) पुणे,
१३) कक्ष अधिकारी (का. ७ ), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवडनस्ती (कार्यासन-९)